**वैधानिक विकास मंडळांसाठी ठेवण्यात येत असलेल्या नियतव्ययातून द्यावयाच्या कामांबाबत मार्गदर्शक सूचना व कार्यपध्दती**

**महाराष्ट्र शासन**

नियोजन विभाग

शासन निर्णय क्रमांक:- वैविमं-१००६/प्र.४१७/का.१४५२.

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक:- २६ डिसेंबर २००६

वाचा:- (१) शा.नि.नि.वि.क्र.वैविमं-१००१/प्र.क्र.१७१/का.१४५२, दि. २३ ऑगस्ट २००१

(२) शा.नि.नि.वि.क्र.वैविमं-१००१/प्र.क्र.३३८/का.१४५२, दि. ३१ ऑक्टोबर २००२

**प्रास्ताविक**

विदर्भ, मराठवाडा व उर्वरित महाराष्ट्रासाठी स्थापन करण्यात आलेल्या वैधानिक विकास मंडळांच्या शिफारशीनुसार द्यावयाच्या कामांसाठी दरवर्षी रु. १०० कोटी नियतव्यय विशेष निधी म्हणून अर्थसंकल्पीत केला जात आहे. या नियतव्ययाचे वाटप तिन्ही विकास मंडळांना मा.राज्यपाल महोदयांच्या निदेशानुसार मंडळांच्या कार्यक्षेत्रातील विकासाच्या अनुशेषाच्या प्रमाणात करण्यात येत आहे. या नियतव्ययातून द्यावयाच्या कामांबाबत मार्गदर्शक सूचना व कार्यपध्दती संदर्भाधिन शासन निर्णयान्वये विहीत करण्यात आलेली आहे.

योजनेची अधिक प्रभावीपणे अंमलबजावणी होऊन शासनाकडून उपलब्ध होणा-या निधीचा विनियोग अनुशेषांतर्गत विकास कामांवर जास्तीत जास्त व्हावा म्हणून मंडळांसाठी ठेवण्यात येत असलेल्या नियतव्ययातून द्यावयाच्या कामांबाबत संदर्भाधिन शासन निर्णयान्वये विहीत करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचना व कार्यपध्दतीमध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत सुधारित मार्गदर्शक सूचना व कार्यपध्दती खालीलप्रमाणे विहीत करण्यात येत आहे:-

**शासन निर्णय**

(१) विशेष निधीचे जिल्हानिहाय वितरण ठरविताना मंडळांनी मंजूर नियतव्ययाच्या १५% निधी सामुहिक विकास योजनेअंतर्गत कामे व ५% निधी मागासलेल्या तालुक्यातील विकास कामांसाठी राखून ठेवावा व उर्वरित ८०% निधीपैकी निम्मा निधी (४०%) मंडळाच्या कार्यक्षेत्रातील जिल्ह्यांमध्ये लोकसंख्येच्या प्रमाणात वाटप करावा व उर्वरित निम्मा निधी (४०%) मंडळाच्या कार्यक्षेत्रातील जिल्ह्यांमधील शिल्लक अनुशेषाच्या प्रमाणात वाटप करावा. त्यानुसार प्रत्येक जिल्ह्याच्या निधीची मर्यादा मंडळांनी निर्धारित करावी.

(२) मंडळांनी त्यांच्या महसूल क्षेत्रातील प्रत्येकी २ अतिमागास तालुक्यांची निवड करावी. वरीलप्रमाणे अतिमागास तालुक्यांसाठी राखून ठेवलेला ५% निधी सदर तालुक्यांतील विकास कामांसाठी खर्च करावा व पुढील ३ वर्षात प्रतिवर्षी मंजूर नियतव्ययाच्या ५% निधी राखून ठेवावा. हा निधी त्या तालुक्यात विकास कामांवर खर्च करावा.

(३) मंडळाला वाटप करण्यात आलेल्या नियतव्ययाच्या मर्यादेतच निधीची कामे मंडळाने शिफारस करावी. अपवादात्मक परिस्थितीमध्ये मंजूर नियतव्ययाच्या १०% पर्यंत अधिक कामांची शिफारस मंडळांनी करावी. मात्र कोणत्याही परिस्थितीमध्ये विकासक्षेत्राच्या अनुशेषाच्या प्रमाणाच्या २५% पेक्षा अधिक कामांची शिफारस विशिष्ट अनुशेष क्षेत्रातील कामांसाठी मंडळांनी करु नये. तथापि, अनुशेषांतर्गत कामाखेरीज अन्य महत्वाच्या व निकडीच्या कामांसाठी मंजूर नियतव्ययाच्या १०% पर्यंतच्या निधीची शिफारस मंडळांनी करण्यास हरकत नाही.

(४) वार्षिक योजनेमध्ये वैधानिक विकास मंडळांसाठी राखून ठेवलेल्या उपलब्ध निधीचे अनुशेषाच्या क्षेत्रनिहाय व जिल्हानिहाय वितरण कसे केले जाणार आहे याचा आराखडा प्रत्येक मंडळाने तयार करुन ता. १५ मे पर्यंत नियोजन विभागास व मा.राज्यपाल महोदयांना सादर करावा.

(५) जिल्हानिहाय निधीचे वितरण निश्चित केल्यावर अनुशेषातील क्षेत्राशी संबंधित कामाची अंमलबजावणी करणाऱ्या शासनाच्या सर्व प्रादेशिक प्रमुख, कार्यान्वयीन यंत्रणा, जिल्हाधिकारी, तसेच जिल्हा परिषद, नगर परिषद, नगरपालिका व महानगरपालिका यांना त्याबाबतची माहिती देऊन त्यांचेकडून कामाची यादी/प्रस्ताव दि. ३० जून पर्यंत पाठविण्याची सूचना मंडळांनी सर्व संबंधित अधिका-यांना प्रत्येक वर्षी दि. ३१ मे पूर्वी द्यावी.

(६) शासकीय यंत्रणा, जिल्हा परिषद, नगर परिषद, नगरपालिका व महानगरपालिका यांचेकडून दि. ३० जून पर्यंत प्राप्त झालेली कामांची यादी/प्रस्ताव, तसेच या मुदतीमध्ये लोकप्रतिनिधी, समाजसेवी संस्था व व्यक्तींकडून प्राप्त झालेले विकास कामांसंबंधीचे अर्ज/प्रस्ताव यांची छाननी करुन अनुशेषाच्या क्षेत्रनिहाय व जिल्हानिहाय कामांची यादी मंडळांनी तयार करावी. त्यानंतर मंडळांच्या बैठकीमध्ये मान्य करण्यात आलेल्या कामांना निधी उपलब्ध करुन देण्याची शिफारस मंडळांनी दि. ३१ जुलैपूर्वी मंत्रालयीन प्रशासकीय विभाग व नियोजन विभाग यांचेकडे करावी व

त्याची प्रत संबंधित प्रादेशिक प्रमुखांना/कार्यान्वयीन यंत्रणेस अग्रेषित करुन मंडळांनी सुचविलेल्या कामांना तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेस ठीचा सविस्तर प्रस्ताव त्यांचे प्रशासकीय विभागाकडे तातडीने सादर करण्याची सूचना करावी.

(७) मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी मंडळांनी शिफारस केलेल्या कामांचे प्रस्ताव, अंदाजपत्रके व तांत्रिक मान्यतेसह दि. ३० सप्टेंबरपर्यंत प्रशासकीय सहमती व निधीचे मागणीकरीता नियोजन विभागाकडे सादर करावेत. मात्र मंडळाने शिफारस केलेल्या ज्या कामांना तांत्रिक/प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली नाही त्याबाबतची माहिती संबंधित प्रशासकीय विभागांनी त्यांच्या प्रादेशिक प्रमुखांना, तसेच मंडळांना देऊन त्रुटींची पूर्तता तातडीने करण्याच्या सूचना कराव्यात.

(८) नियोजन विभागाने या प्रस्तावांची छाननी करुन दि. ३१ ऑक्टोबर पर्यंत संबंधित प्रशासकीय विभागाला निधी उपलब्ध करुन द्यावा.

(९) मंत्रालयीन प्रशासकीय विभागाने मंडळाने शिफारस केलेल्या कामांसाठी सविस्तर प्रशासकीय मान्यतेचे आदेश काढून नियोजन विभागाने उपलब्ध केलेला निधी १५ दिवसांच्या आत संबंधित क्षेत्रिय यंत्रणेला वितरीत करुन कामांची अंमलबजावणी त्वरीत सुरु करावी.

(१०) शासकीय यंत्रणा, जिल्हा परिषद, नगर परिषद, नगरपालिका, महानगरपालिका, तसेच लोकप्रतिनिधी, समाजसेवी संस्था व अन्य व्यक्तींकडून सुचविण्यात आलेल्या कामांचे प्रस्ताव/अर्जासोबत खर्चाचे अंदाजपत्रक व सदर काम शासनाच्या अन्य योजनेतून/निधीतून हाती घेण्यात आलेले नाही अशा अर्थाचे संबंधित अधिका-याचे/कार्यालयाचे प्रमाणपत्र प्राप्त करुन घेतल्यानंतरच अशा कामांना निधी उपलब्ध करुन देण्याची शिफारस मंडळांनी करावी.

(११) मंडळांच्या शिफारशीनुसार ज्या कामांसाठी नियोजन विभागाकडून प्रादेशिक विभागांना निधी वितरीत करण्यात आलेला आहे त्या प्रादेशिक विभागांनी/क्षेत्रीय यंत्रणांनी काम पूर्ण झाल्यावर "कामांच्या पूर्णतेचे प्रमाणपत्र" व निधी संपूर्णपणे वापरण्याबाबतचे त्या विभागाने विहीत केलेल्या नमुन्यातील "उपयोगिता प्रमाणपत्र" मंडळाला वेळच्या वेळी सादर/प्राप्त झालेले आहे याबाबतची माहिती त्रैमासिक नियतकालिकाचे (quarterly report) स्वरुपात मंडळांनी मा.राज्यपालांच्या सचिवांना व शासनाच्या नियोजन विभागाकडे सादर करावे.

संदर्भाधिन अ.क्र.१ येथील दि. २३.८.२००१ च्या शासन निर्णयातील विशेष निधी अर्थसंकल्पीत करण्याची पध्दती व त्यासोबतच्या प्रपत्र-१ व २ मध्ये अनुक्रमे अनुज्ञेय असलेल्या व नसलेल्या कामांची जी यादी दर्शविण्यात आली आहे त्यात व तसेच संदर्भाधिन क्र.२ येथील दि. ३१ ऑक्टोबर २००२ मध्ये नमूद केलेल्या अनुज्ञेय कामांत कोणताही बदल नाही.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( दि.रा.डिंगळे )
अवर सचिव

प्रति

१. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
२. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
५. वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-१५)
६. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई-४०० ०३५.
७. सदस्य सचिव, विदर्भ वैधानिक विकास मंडळ, साऊथ अंबाझरी रोड, अंध विद्यालयासमोर, नागपूर
८. सदस्य सचिव, मराठवाडा वैधानिक विकास मंडळ, नवीन प्रशासकीय इमारत, जिल्हाधिकारी कार्यालय कंपाऊंड, औरंगाबाद
९. सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ, नवीन प्रशासकीय भवन, १८ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई
१०. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
११. सर्व विभागीय आयुक्त
१२. निरनिराळ्या विभागांतील विभाग प्रमुख/प्रादेशिक प्रमुख
१३. सर्व जिल्हाधिकारी
१४. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१५. नियोजन विभागातील सर्व अधिकारी